उच्च न्यायालय/सर्वोच्च न्यायालय येथे
अपिल करताना अनुसरावयाची कार्यपध्दती.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
परिपत्रक क्रमांक : एमआयएस-१००५/प्र.क्र.२४८/पोल-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :-२८ जुलै, २००५

## परिपत्रक

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, महत्वाच्या व संवेदनशील प्रकरणांमध्ये उच्च न्यायालय किंवा सर्वोच्च न्यायालयात याचिका, अपिल किंवा इतर कोणतेही अर्ज दाखल करताना गृह विभागाची मान्यता न घेता परस्पर विधी व न्याय विभागास क्षेत्रीय अधिकाऱ्यांकडून प्रस्ताव सादर करण्यात येतात. परिणामी महत्वाच्या व संवेदनशील प्रकरणी होत असलेल्या कार्यवाही/प्रगतीबाबत गृह विभागास कोणतीही कल्पना नसते व गृह विभागाचे मत विचारात घेतले जात नाहीत. प्रशासकीय शिस्तीच्या दृष्टीने ही बाब अयोग्य आहे.

२. सबब या परिपत्रकाद्वारे गृह विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख, पोलीस महासंचालक, पोलीस आयुक्त, यांना सूचना देण्यात येते की, विधी अधिकारी कार्य नियमावलीच्या नियम ५० च्या तरतूदीनुसार उच्च नयायालयात किंवा सर्वोच्च न्यायालयात अपिल वा अर्ज सादर करताना धोरणात्मक तसेच महत्वाच्या व संवेदनशील प्रकरणात असे प्रस्ताव गृह विभागामार्फतच विधी व न्याय विभागास पाठविण्यात यावेत. उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

(प्र. ता. गौड)
सह सचिव, महाराष्ट्र शासन
गृह विभाग

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधीक्षक,
संचालक, सरकारी अभियोग संचालनालय, मुंबई,
गृह विभागा अंतर्गत सर्व विभाग प्रमुख
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
गृह विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी/कक्ष अधिकारी
निवड नस्ती (पोल-८)

*****